**महाराष्ट्र शासन**

क्रमांक - संकिर्ण- १०१९/प्र.क्र.०४ /वि.आ.कक्ष

वित्त विभाग, मंत्रालय,
मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई - ४०० ०३२.
दि - १८/०१/२०१९.

**संदर्भ :-**

१. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-१२००४/प्र.क्र.१५/१२, दि.२५.०५.२००६.
२. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.पीओडी-१००७/प्र.क्र.९/१८(र.व.का.), दि.१४.११.२०१३.
३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. संकिर्ण-२०१२/प्र.क्र.५४/१८(र.व.का.), दि.११.०८.२०१४.

## कार्यालयीन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हा राज्यात लागू करण्यात आलेला आहे. सदर अधिनियमाच्या कलम ९(१) व (२) तसेच शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास नियम २०१३ तयार करण्यात आलेले असून ते दिनांक १४ नोव्हेंबर, २०१३ च्या अधिसूचनेद्वारे राज्यात लागू करण्यात आलेले आहेत. त्यातील कलम ६ अंतर्गत विभागाशी/कार्यालयाशी संबंधित सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करणाऱ्या अधिकाऱ्यांचे शक्यतो तीन स्तर निर्धारित करण्याचे निदेश देण्यात आलेले आहेत.

त्यानुषंगाने वित्त विभाग, वित्त आयोग कक्ष या कार्यासनाशी संबंधित विषयाच्या बाबतीत सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे निर्णय घेण्यासाठी सादरीकरणाचे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरिष्ठ अधिकाऱ्यांचे निदेश असल्यास किंवा काही विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे योग्य तो बदल करण्यात येईल. तसेच धोरणात्मक बाबींच्या प्रकरणात दि.११.०८.२०१४ च्या परिपत्रकात नमूद केल्यानुसार सादरीकरणाचे तीनपेक्षा अधिक स्तर असतील.

सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०११८१३१२२७९३०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidya Hemant Waghmare

Digitally signed by Vidya Hemant Waghmare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5993e61fd0be4924fde822ea148e6b9d3115ae54bc78125bd04084eb1cb29e20, serialNumber=f93efe7b946bf26ff989d6e5e01e1b122b9eb4e3e4e6799cb8e82b2d33d58dfc, cn=Vidya Hemant Waghmare
Date: 2019.01.18 13:19:51 +05'30'

(विद्या वाघमारे)
अवर सचिव, वित्त विभाग

**प्रत :-**

१) अ.मु.स.(वित्त)/प्र.स.(व्यय)/प्र.स.(ले व को.)/सचिव (वि.सु.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२) उप सचिव(आस्थापना), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) उप सचिव, कार्यासन क्र.१८ (र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) निवडनस्ती.

**वित्त विभाग, कार्यालयीन आदेश क्र. संकिर्ण-२०१९/प्र.क्र.४/वित्त आयोग कक्ष दि.१८.०१.२०१९ सोबतचे विवरणपत्र**

| अ.क्र. | विषय | सादरीकरणाचे तीन स्तर | | |
|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | केंद्रीय वित्त आयोग विषयक कामकाज | सहायक कक्ष अधिकारी/<br>कक्ष अधिकारी/<br>अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव<br>(वित्तीय सुधारणा)<br>अपर मुख्य सचिव (वित्त)<br>मा. मंत्री (वित्त) |
| २. | केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार प्राप्त निधीच्या खर्चाबाबत आढावा | सहायक कक्ष अधिकारी/<br>कक्ष अधिकारी/<br>अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (वि.सु.) |
| ३ | राजकोषिय उत्तरदायित्व व अर्थसंकल्पिय व्यवस्थापन अधिनियम-२००५ आणि तद्नुषंगिक नियम तयार करणे | सहायक कक्ष अधिकारी/<br>कक्ष अधिकारी/<br>अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (वि.सु.)<br>अ.मु.स (वित्त)<br>मा. मंत्री (वित्त) |
| ४ | राजकोषिय उत्तरदायित्व व अर्थसंकल्पिय व्यवस्थापन अधिनियम-२००५ नुसार अर्धवार्षिक आढावा करणे | संशोधन अधिकारी/<br>कक्ष अधिकारी/<br>अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (वि.सु.)<br>अ.मु.स (वित्त)<br>मा. मंत्री (वित्त) |
| ५ | राजकोषिय उत्तरदायित्व व अर्थसंकल्पिय व्यवस्थापन अधिनियम-२००५ नुसार प्रकाशने प्रसिध्द करणे | सहायक कक्ष अधिकारी/<br>संशोधन अधिकारी/<br>कक्ष अधिकारी/<br>अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (वि.सु.)<br>अ.मु.स (वित्त)<br>मा. मंत्री (वित्त) |
| ६. | राज्य वित्त आयोग विषयक अर्थसंकल्प विषयक कामकाज | सहायक कक्ष अधिकारी/<br>कक्ष अधिकारी/<br>अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (वि.सु.) |
| ७. | राज्य वित्त आयोगाची स्थापना व पदनिर्मितीचे कामकाज | कक्ष अधिकारी/<br>अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (वि.सु.)<br>अपर मुख्य सचिव(वित्त)<br>मा. मंत्री (वित्त)<br>मा.मुख्यमंत्री |
| ८. | राज्य वित्त आयोगाशी संबधित उपरोक्त कामे वगळून उर्वरित कामकाज | सहायक कक्ष अधिकारी/<br>कक्ष अधिकारी/<br>अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (वि.सु.)<br>अपर मुख्य सचिव (वित्त) |